सन २०१८-१९ च्या दुष्काळी परिस्थितीत जलाशयाखाली/ तलावाखालील (Reservoir / Tank-Bed) जमीनीचा विनियोग फक्त चारा पीके घेण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
कृषि व पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,
शासन निर्णय क्र.एफडीआर-२०१७/प्र.क्र.१६७/पदुम-४
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक:- १५ नोव्हेंबर, २०१८

संदर्भ :- १) महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिका, सहावी आवृत्ती १९८४ परिशिष्ट-१७
२) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र एससीवाय/२०१८/प्र.क्र. १९ /म-७ दिनांक ३१ ऑक्टोबर, २०१८
३) दुष्काळ व्यवस्थापन आराखडा, कृषि व किसान कल्याण विभाग, भारत सरकार अध्याय ४.८ (पान क्र ६०)

प्रस्तावना-

महाराष्ट्राच्या बहुतांश भागात अत्यल्प पर्जन्यमानामुळे दुष्काळी परिस्थिती निर्माण झाली आहे. या बाबत उपरोक्त संदर्भ क्र.२ अन्वये सन २०१८ च्या खरीप हंगामामध्ये १५१ तालुक्यांमध्ये दुष्काळ घोषित करण्यात आलेला आहे. संभाव्य चारा टंचाई विचारात घेता, दि. १३.११.२०१८ रोजीच्या मंत्रिमंडळ बैठकीत चारा पिकांचे उत्पादन वाढविण्याचे निर्देश देण्यात आले आहेत.

जलसंपदा तसेच, मृद व जलसंधारण विभागाच्या प्रकल्पांमध्ये पाणीसाठा कमी झाल्यामुळे बुडीताखालील जमिनी मोकळया / उघडया पडलेल्या आहेत. अशा जमिनी वैरण पिकांच्या लागवडी करिता सर्वात उपयुक्त असतात. जलाशय आणि तलावाखालील (Reservoir / Tank-Bed) जमीनीचा विनियोग गाळपेर पीकासाठी दरवर्षी करण्यात येतो. त्यासाठी भाडेपट्टा देण्याच्या पध्दतीविषयी महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिका, सहावी आवृत्ती १९८४, परिशिष्ट-१७ अन्वये सविस्तर नियम करण्यात आलेले आहेत.

भारत सरकारच्या दुष्काळ व्यवस्थापन आराखडा २०१७ मध्ये जलसंपदा विभागाची कर्तव्ये व जबाबदाऱ्या खालीलप्रमाणे विहित करण्यात आलेल्या आहेत:

The irrigation department should consider allowing reservoir and tank beds under its control to be leased out for cultivating short duration grasses or seasonal fodder crops. The Collector, with the permission of the irrigation department, could lease out the reservoir and tank bed land on short term lease subject to the condition that the lessees should grow fodder crop therein and agree to sell the grass / fodder to needy farmers at the price to be fixed by the Collector.

त्यानुसार राज्यातील दुष्काळी परिस्थिती विचारात घेता, गाळपेर क्षेत्रावर चारा पीकांचे उत्पादन करुन जनावरांसाठी चारा उपलब्ध करण्याच्या दृष्टीने निर्देश देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याबाबत शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णयः-**

१) जलसंपदा, मृद व जलसंधारण विभागाकडील जलाशयाखालील / तलावाखालील (Reservoir / Tank-Bed) जमीन शेतकऱ्यांना चारा पिके उत्पादनाकरिता वर्ष २०१८-१९ मधील रब्बी व उन्हाळी हंगामासाठी नाममात्र रु. १ /- दराने भाडेपट्टयावर देण्यात यावी. याकरिता महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिका, सहावी आवृत्ती १९८४, परिशिष्ट-१७ मधील ३ (तीन) नुसार कार्यवाही करावी.

२) गाळपेर जमिनीमध्ये जनावरांसाठी सुयोग्य अशी वैरण व चारा पीके (उदा. मका, ज्वारी व बाजरी किंवा वैरण समृध्द पीके जसे की, न्युट्रिफिड व तत्सम) घेण्यात यावी.

३) चारा पीके / वैरण पीके घेण्याकरिता पशुसंवर्धन विभागामार्फत राष्ट्रीय कृषि विकास योजना व विभागाच्या विविध योजनांमधून बियाण्यांची विनामूल्य उपलब्धता करुन देण्यात यावी.

४) उपरोक्त प्रमाणे कार्यवाही करताना कृषि व पशुसंवर्धन विभागांच्या अधिकाऱ्यांनी शेतकऱ्यांना आवश्यक व उपयुक्त मार्गदर्शन करावे.

५) गाळपेर जमिनीवर घेण्यात येणाऱ्या वैरण पीकासाठी जलाशयातील पाणी विनामुल्य उपलब्ध करुन दयावे. त्यासाठी त्यांना कोणतीही पाणीपट्टी आकारण्यात येऊ नये.

६) या पध्दतीने उत्पादीत केलेला चारा शेतकऱ्यांच्या स्वतःच्या पशुधनाकरिता उपयोगात आणता येईल व तद्नंतरचा अतिरिक्त चारा शिवारातील इतर दुग्ध उत्पादक शेतकऱ्यांना आवश्यकतेनुसार उपलब्ध करुन द्यावयाचा आहे.

७) जिल्हानिहाय / प्रकल्पनिहाय उपलब्ध गाळपेर क्षेत्रांचे सर्वेक्षण तात्काळ हाती घेऊन हंगामी भाडेपट्टीवर देण्याची कार्यवाही जिल्हाधिकारी यांनी तातडीने हाती घ्यावी. प्रत्येक जिल्हयात कमीत कमी २००० हे. गाळपेर क्षेत्रावर चारा पीके / वैरण पिकांची लागवड करणे बंधनकारक करण्यात आलेले आहे.

८) लाभ क्षेत्रात देखील मका, ज्वारी, बाजरी व न्युट्रिफिड तत्सम वैरण पिकांची लागवड करण्यास प्राधान्य देण्यात यावे.

९) गाळपेरा क्षेत्रात चारा लागवड करण्यासाठी लाभार्थ्यांची निवड करताना पुढीलप्रमाणे अग्रक्रम देण्यात यावा:-

अ) ज्या व्यक्तीं किंवा व्यक्तींच्या जमिनीचे नविन तलाव, उत्प्लव बांधे, बांध इ. बांधण्यासाठी संपादन करण्यात आलेली आहे अशी व्यक्ती किंवा अशा व्यक्ती.

आ) स्थानिक भूमिहीन मागासवर्ग आणि अन्य लोक, यांच्या संमिश्र सहकारी संस्था मात्र त्यात मागासवर्गीय सदस्यांची संख्या अधिक असली पाहिजे.

इ) स्थानिक भूमिहीन मागासवर्गीय लोकांच्या सहकारी संस्था

ई) अन्य स्थानिक भूमिहीन लोकांच्या सहकारी संस्था

उ) स्थानिक भूमिहीन मागासवर्गीय लोक

ऊ) अन्य जमातींचे स्थानिक भूमिहीन लोक

ऋ) बाहेरील भूमिहीन लोक

ऌ) स्थानिक भूधारक

ऍ) उपरोक्त पैकी कोणतेही लाभार्थी उपलब्ध न झाल्यास गावातील जास्त पशुधन असलेल्या शेतकऱ्यांना प्राधान्य देण्यात यावे.

१०) या योजनेची अंमलबजावणी करण्यासाठी खालीलप्रमाणे कालबध्द कार्यक्रम निश्चित करण्यात येत आहे.

| अ.क्र. | बाब | कालमर्यादा |
|---|---|---|
| १ | लाभार्थी निवड, समन्वय व सनियंत्रण समितीच्या मान्यतेने जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त यांनी योजनेस जाहीर प्रसिध्दी देणे. | दिनांक २४.११.२०१८ पर्यंत |
| २ | लाभार्थ्यांकडून अर्ज मागविणे | दिनांक ०४.१२.२०१८ पर्यंत |
| ३ | लाभार्थ्यांची निवड करुन लाभार्थी यादी प्रसिध्द करणे | दिनांक १०.१२.२०१८ पर्यंत |
| ४ | निवडलेल्या लाभार्थ्यांना निविष्ठांचे वाटप | दिनांक १५.१२.२०१८ पर्यंत |

(तथापि, स्थानिक परिस्थितीनुसार उपरोक्त वेळापत्रकात आवश्यक तो बदल करण्याचा अधिकार जिल्हाधिकारी यांना राहील.)

११) सर्व जल स्त्रोतांचे व चारा निर्मिती स्त्रोतांचे मॅपिंग करुन तंत्र शुध्द पध्दतीने नियोजन जिल्हाधिकारी यांनी करावे.

१२) जिल्हानिहाय / प्रकल्पनिहाय उपलब्ध गाळपेर क्षेत्र, चारा पीकाखाली घेण्यात आलेले क्षेत्र, चाऱ्याचे होणारे अंदाजित उत्पन्न (Metric tone) याची आकडेवारी जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त यांनी शासनास सादर करावी.

१३) गाळपेर जमिनीवर चारा उत्पादन घेऊन चारा टंचाई निवारणाकरिता लाभार्थी निवड, समन्वय व संनियंत्रणासाठी खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे.

(i) जिल्हाधिकारी - अध्यक्ष
(ii) जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी - सदस्य
(iii) अधिक्षक अभियंता (सिंचन) - सदस्य
(iv) कार्यकारी अधियंता मृद व जलसंधारण - सदस्य
(v) जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी - सदस्य
(vi) जिल्हा पशुसंवर्धन उप आयुक्त - सदस्य सचिव

१४) उपरोक्त प्रमाणे गठीत लाभार्थी निवड, समन्वय व संनियंत्रण समितीची बैठक तात्काळ घेऊन जिल्हास्तरावर वरील सुचनांनूसार नियोजन करुन त्याचा अहवाल शासनास सादर करावा.

१५) गाळपेर जमिनीवर घेण्यात येणारा वैरण विकास कार्यक्रम दुष्काळ कालावधीपुरताच मर्यादित राहील याची नोंद घ्यावी.

सदर शासन निर्णय जलसंपदा विभाग, मृद व जलसंधारण विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१११५१३०८०७८४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dinesh Kumar Jain

Digitally signed by Dinesh Kumar Jain
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Chief Secretary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ea3b8615acaf5a916338801298bc1b7123bd0cac17faf57848ccd7382e28252c, cn=Dinesh Kumar Jain
Date: 2018.11.15 15:16:27 +05'30'

**(दिनेश कुमार जैन)**
**मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत-**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) सर्व मा.मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
४) सर्व विधानसभा सदस्य / विधान परिषद सदस्य
५) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६) सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई.
७) सचिव, महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण, मुंबई.
८) सर्व कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग
९) आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०) आयुक्त (पशुसंवर्धन), महाराष्ट्र राज्य, पुणे.
११) सर्व विभागीय आयुक्त
१२) सर्व जिल्हाधिकारी
१३) सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग
१४) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
१५) सर्व प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन
१६) सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
१७) सर्व जिल्हा पशुसवंर्धन उपआयुक्त
१८) सर्व जिल्हा पशुसवंर्धन अधिकारी, जिल्हा परिषद
१९) सर्व अधिक्षक अभियंता, जलसंपदा विभाग
२०) सर्व कार्यकारी अभियंता, जलसंपदा विभाग / मृद व जलसंधारण विभाग